असा. क्र. ३२

रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५

सत्यमेव जयते

# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

बुधवार, जानेवारी १९, २००५/पौष २९, शके १९२६

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग चार-ब

**महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

### गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १९ जानेवारी २००५

### अधिसूचना

**मुंबई दारूबंदी अधिनियम, १९४९.**

क्रमांक एफएलआर. ११०४/सीआर-२१/इएक्ससी-२.—ज्याअर्थी, महाराष्ट्र शासनास, मुंबई विदेशी मद्य नियम, १९५३ यात सुधारणा करण्यासाठी खालील नियम तावडतोब अंमलात आणणे आवश्यक वाटते आणि म्हणून, मुंबई दारूबंदी अधिनियम, १९४९ (१९४९ चा मुंबई २५) याच्या कलम १४३ च्या पोट-कलम (३) च्या परंतुकामधील तरतुदीनुसार पूर्वप्रसिद्धीशिवाय करावयाचे आहे.

त्याअर्थी, आता, उक्त अधिनियमाच्या कलम १४३ च्या पोट-कलम (२) च्या खंड (ब) आणि (क) द्वारा प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा आणि त्या बाबतीत त्यास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे, मुंबई विदेशी मद्य नियम, १९५३ यात आणखी सुधारणा करण्यासाठी खालील नियम करीत आहे :—

१. या नियमांना, मुंबई विदेशी मद्य (सुधारणा) नियम, २००५ असे संबोधण्यात यावे.

२. मुंबई विदेशी मद्य नियम, १९५३ (यात यापुढे ज्यांचा उल्लेख " मुख्य नियम " असा करण्यात आला आहे) याच्या नियम ३२ मधील पोट-नियम (एक) मध्ये, खंड (ड) ऐवजी पुढील खंड अंतर्भूत करण्यात यावा :—

" (ड) १८ वर्षांहून कमी वय नसलेल्या कोणत्याही व्यक्तीला सौम्य बिअर, सौम्य मद्य, "

३. मुख्य नियमांच्या नियम ५२ मध्ये,—

(अ) पोट-नियम (एक) ऐवजी पुढील पोट-नियम अंतर्भूत करण्यात यावा :—

" (१) १८ वर्षांहून कमी वय नसलेल्या कोणत्याही व्यक्तीला सौम्य बिअर, सौम्य मद्य पेगमध्ये किंवा बाटल्यांमध्ये विकण्यात यावे आणि हॉटेलमध्ये किंवा उपाहारगृहामध्ये मद्यसेवन करण्याच्या प्रायोजनासाठी परवाना प्राधिकाऱ्याने नेमून दिलेल्या व मान्यता दिलेल्या जागेत विदेशी व्यक्तीस किंवा परवानाधारकास आणि अशा हॉटेलमध्ये राहणाऱ्या व्यक्तीस आपल्या खोलीत मद्यसेवन करण्दासाठी विदेशी मद्य पेगमध्ये किंवा बाटल्यांमध्ये विकता येईल :

परंतु, अशा हॉटेलच्या किंवा उपाहारगृहाच्या भोजन कक्षामध्ये विदेशी व्यक्तींना किंवा १८ वर्षांहून कमी वय नसलेल्या व्यक्तींना सौम्य बिअर, सौम्य मद्य देण्याची व्यवस्था करता येईल. "

(ब) पोट-नियम (२) ऐवजी पुढील पोट-नियम अंतर्भूत करण्यात यावा :—

" (२) क्लबमध्ये त्याच्या कोणत्याही सदस्यास किंवा १८ वर्षांहून कमी वय नसलेल्या त्याच्या पाहुण्यास सौम्य बिअर, सौम्य मद्य किंवा बाटल्यांमध्ये विकता येईल आणि क्लबमध्ये मद्यसेवन करण्याच्या प्रयोजनार्थ, परवाना प्राधिकाऱ्याने नेमून दिलेल्या व मान्यता दिलेल्या जागेत परवानाधारकास किंवा क्लबमधील जागेत राहणाऱ्या परवानाधारकास किंवा क्लबमध्ये राहणाऱ्या त्याच्या सदस्यास आपल्या खोलीत मद्यसेवन करण्यासाठी विदेशी मद्य पेगमध्ये किंवा बाटल्यांमध्ये विकता येईल. "

४. मुख्य नियमांच्या नियम ५७ मध्ये, पोट-नियम (एक) च्या खंड (अ) मधील परंतुकाऐवजी पुढील परंतुक अंतर्भूत करण्यात यावा :—

" परंतु, हॉटेलमध्ये राहणाऱ्या १८ वर्षांहून कमी वय नसलेल्या कोणत्याही व्यक्तीस आणि क्लबच्या बाबतीत त्याच्या निवासी सदस्यास केवळ आपल्या खोलीमध्येच मद्यसेवन करण्यासाठी सौम्य बिअर, सौम्य मद्य विकता येईल. "

५. मुख्य नियमांच्या नियम ७०-ड मध्ये,—

(अ) पोट-नियम (१) मध्ये, " २५ वर्षांहून अधिक वय असलेल्या " या मजकुराऐवजी " २१ वर्षांहून कमी वय नसलेल्या " हा मजकूर अंतर्भूत करण्यात यावा.

(ब) पोट-नियम (२) मध्ये, " २५ वर्षांहून अधिक वय असलेल्या " या मजकुराऐवजी " २१ वर्षांपेक्षा कमी वय नसलेल्या " हा मजकूर अंतर्भूत करण्यात यावा.

(क) पोट-नियम (३) मध्ये, " २५ वर्षांहून अधिक वय असलेल्या " या मजकुराऐवजी " २१ वर्षांपेक्षा कमी वय नसलेल्या " हा मजकूर अंतर्भूत करण्यात यावा.".

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

कृ. श्री. घाडगे,
शासनाचे उप सचिव.

## HOME DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated 19th January 2005

*NOTIFICATION*

BOMBAY PROHIBITION ACT, 1949.

No. FLR. 1104/ CR-21/EXC-2.—Whereas the Government of Maharashtra considers that the following rules further to amend the Bombay Foreign Liquor Rules, 1953, should be brought into force at once and therefore, the rules should be made without previous publication, as provided by the proviso to sub-section (*3*) of section 143 of the Bombay Prohibition Act, 1949 (Bom. XXV of 1949) ;

Now, therefore, in exercise of the powers conferred by clauses (*b*) and (*k*) of sub-section (*2*) of section 143 of the said Act and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra is hereby pleased to make the following rules, further to amend the Maharashtra Foreign Liquor Rule, 1953 as follows, namely :—

1. These rules may be called the Bombay Foreign Liquor (Amendment) Rules, 2005.

2. In rule 32 of the Bombay Foreign Liquor Rules, 1953 (hereinafter referred to as " the principal rules "), in sub-rule (*i*), for clause (*d*) the following clause shall be substituted, namely :—

" (*d*) mild beer, mild liquor to any person who is not below 18 years of age. "

3. In rule 52 of the principal rules,—

(A) for sub-rule (*i*), the following shall be substituted namely :—

" (1) Mild beer, mild liquor may be sold in pegs or bottles to any person who is not below 18 years of age and foreign liquor may be sold in pegs or bottles to a foreigner or a permit holder at a hotel or restaurant for consumption in the area assigned for that purpose and approved by the licensing authority and to a resident in such hotel for consumption in his room :

Provided that, mild beer, mild liquor may be served to foreigners or the persons who is not below 18 years of age in the dinning room of such hotel or restaurant. "

(B) for sub-rule (2) ; following sub-rule shall be substituted, namely :—

" (2) Mild beer, mild liquor may be sold in pegs or bottles at a club to any member thereof or his guest who is not below 18 years of age and foreign liquor may be sold in pegs or bottles to a permit holder at a club for consumption in the area assigned for that purpose and approved by the licensing authority or to a member of the club residing therein for consumption in his room. "

4. In rule 57 of the principal rules, in sub-rule (*i*), in clause (*a*), for the proviso, the following proviso shall be substituted, namely :—

" Provided that, mild beer, mild liquor may be sold to any person who is not below 18 years of age, residing at the hotel and in the case of a club, to resident member for consumption in his room only. "

5. In rule 70-D of the principal rules,—

(A) in sub-rule (1), for the words and figures " above the age of 25 years ", the words and figures " not below the age of 21 years " shall be substituted.

(B) in sub-rule (2), for the words and figures " above the age of 25 years ", the words and figures " not below the age of 21 years " shall be substituted.

(C) in sub-rule (3), for the words and figures " above the age of 25 years ", the words and figures " not below the age of 21 years " shall be substituted.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

K. S. GHADAGE,
Deputy Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई